मौजा गोंदिया येथील नझुल शिट क्र. ८ व ९, प्लॉट क्र. ४ मधिल जागेपैकी २१३६.५० चौ.मी. जागेवर समाज भवन बांधकामासाठी प्रशासकीय मंजुरी देणेबाबत...

# महाराष्ट्र शासन
## सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः दवसु-२०१४/प्र.क्र.८४ /अजाक-१

हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
तारीख: ६ ऑगष्ट,२०१४

**वाचा**

१) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांक :- दवसु-२०११/ प्र.क्र.४२४/अजाक,दिनांक २४.१०.२०११
२) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांक :- दवसु-२०११/ प्र.क्र.४४२/अजाक,दिनांक ५.१२.२०११
३) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांक :-दवसु-२०१३/ प्र.क्र.११३/अजाक-१,दिनांक १०.०९.२०१३
४) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांक :-दवसु-२०१३/ प्र.क्र.१७९/भाग-३/अजाक-१,दिनांक २२.१.२०१४
५) शासन ज्ञापन, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांक :-बीजीटी-२०१४/ प्र.क्र.८१/अर्थसंकल्प, दिनांक ८.७.२०१४

**प्रस्तावना**

अनुसूचित जातीच्या समाजाचे लोक समुहाने गावाच्या परिसिमेत वास्तव्य करीत राहतात. तसेच ब-याचदा अनुसूचित जातींपैकी उपजाती व जातीनिहाय घरे वेगवेगळया समुहाने एकत्रित वास्तव्य करुन राहतात व अशा प्रकारे वास्तव्य करुन असलेल्या सर्व जाती/उपजाती यांच्या वस्तीस दलित वस्ती असे संबोधण्यात येते. या वस्त्यांमध्ये मुलभूत सोयीसुविधा पुरवून तेथील लोकांचे जीवनमान उंचावण्यासाठी सन १९७४ पासून दलित वस्ती सुधार योजनेची अंमलबजावणी करण्यात येत आहे. सदर योजनेअंतर्गत दलित वस्त्यांमध्ये अंतर्गत रस्ते,नाली बांधणे, पाणीपुरवठा,पाण्याचा हौद,समाजमंदीर रस्त्यावरील

विद्युत पुरवठा,शौचालये इ. गरजा विचारात घेऊन सदर नागरी सुविधांच्या विकास कामांना प्रशासकीय मंजूरी दिली जाते.

अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांच्या वस्तीचा विकास करणे (ग्रामिण) (पूर्वीचे नाव दलित वस्ती सुधार योजना) या योजनेसाठी सन २०१४-१५ या आर्थिक वर्षात रु.४३०.०० लाख इतकी पुरक मागणी मंजूर करण्यात आली आहे. सदर निधीतून रु.३००.०० लाख (रुपये तीन कोटी फक्त) इतका निधी एक विशेष बाब म्हणुन गोंदिया येथील समाज भवन बांधकामासाठी देण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यास अनुसरुन शासन पुढीलप्रमाणे आदेश देत आहे.

## शासन निर्णय

सन २०१४-१५ या आर्थिक वर्षात पुरवणी मागणीद्वारे उपलब्ध झालेल्या ४३०.०० लाख लाख एवढया तरतुदीतून समाज भवन बांधकामासाठी रु.३००.०० लाख (रुपये तीन कोटी फक्त) इतकी तरतुद प्राप्त झालेली आहे. या प्रकरणी मौजा गोंदिया येथील नझुल शिट क्र. ८ व ९, प्लॉट क्र. ४ मधिल जागेपैकी २१३६.५० चौ.मी. जागेवर समाज भवन बांधकामासाठी सहायक अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग गोंदिया यांचेकडुन अंदाजपत्रक प्राप्त झालेले आहे. त्यास कार्यकारी अभियंता सार्वजनिक बांधकाम विभाग (रोहयो) गोंदिया यानी तांत्रीक मान्यता दिलेली आहे. सदर कामास एक विशेष बाब म्हणुन या द्वारे प्रशासकीय मंजुरी देण्यात येत आहे.

२. सदर काम वरील संदर्भ क्रमांक ४ येथे नमुद केलेल्या शासन निर्णय दिनांक २२.०१.२०१४ नुसार सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत करुन घ्यावे.

३. या बाबींवर होणारा खर्च पुढीलप्रमाणे नमुद केलेल्या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व तो चालू आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा :-

२२२५ अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्ग यांचे कल्याण
०१ अनुसूचित जातीचे कल्याण
८०० इतर खर्च
(०६)(०२) महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम १९६१, याच्या कलम १८७ अन्वये जिल्हा परिषदांना अनुदाने दलित वस्त्यांची सुधारणा
(२२२५ ३०५ ५)
३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)मागणी
क्रमांक एन ३

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८२११२०२०५७८२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Siddharth Amrutrao Zalte

Digitally signed by Siddharth Amrutrao Zalte
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE & SPECIAL ASSISTANCE, postalCode=400032, st=MAHARASHTRA, cn=Siddharth Amrutrao Zalte
Date: 2014.08.21 11:58:36 +05'30'

**(सिद्धार्थ झाल्टे)**
अवर सचिव,महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. आयुक्त,समाजकल्याण संचालनालय,महाराष्ट्र राज्य,पुणे
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेय/लेखा परीक्षण) महाराष्ट्र-१/२,मुंबई/नागपूर.
३. मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद, गोंदिया.
४. सहआयुक्त,समाजकल्याण (अनुसूचित जाती उपयोजना) महाराष्ट्र राज्य,पुणे
५. जिल्हा कोषागार अधिकारी,गोंदिया.
६. वित्त विभाग/नियोजन विभाग,मंत्रालय,मुंबई
७. जिल्हा समाजकल्याण अधिकारी,जिल्हा परिषद,गोंदिया.
८. उपसचिव/कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प/विघयो), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,मंत्रालय,मुंबई.
९. सहायक अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग गोंदिया.
१०.मुख्य अधिकारी, नगर परिषद गोंदिया.
११.निवडनस्ती (अजाक-१)